मुरलीधर जावडेकर

# नवरा नको ग बाई

(पथनाट्ये)

नवरा नको ग बाई
गर्द गर्द गर्द
विज्ञान महाराज की जय !

मुरलीधर जावडेकर साहित्यकला प्रतिष्ठान, पुणे

**कवी**
**डॉ. मुरलीधर जावडेकर**
महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळ
उच्च उत्पन्न गट वसाहत
इमारत क्र.१, गाळा क्र. ९
संत तुकारामनगर, पिंपरी,
पुणे - ४११ ०१८.
दूरध्वनी ०२०-२७४२१६८३

**मुद्रक-प्रकाशक**
मुरलीधर जावडेकर साहित्यकला प्रतिष्ठान

**प्रकाशन** - २०११

**देणगी मूल्य** - रुपये ३०/- फक्त

## अर्पणपत्रिका

ज्या माझ्या विद्यार्थ्यांनी, विद्यार्थिनींनी, आणि इतर अनेक तरुण तरुणींनी या पथनाट्यांत रंगून भाग घेतला (भिन्न भिन्न जातिधर्म असूनसुद्धा !) त्या सर्वांच्या आठवणी माझ्या मनांत कायम जाग्या राहतील. त्यांना आणि इतर सर्व विद्यार्थिविद्यार्थिनींना सप्रेम भेट !

**मुरलीधर**

## अनुक्रमणिका





# विज्ञान महाराज की जय !

सूत्रधार - धर्म नको, विज्ञान हवे
कर्म हवे, अध्यात्म नव्हे
चंद्राला आम्ही भारी
करू मंगळावर स्वारी
पुढचे पुढचे ग्रह पाहू
वस्ती करुनी वर राहू
धन घेऊ तेथील लुटून
देऊ सर्वांना वाटून
नवी नवी विश्वे निर्मू
मित्रमैत्रिणी त्यांत रमू
आनंदी आनंद करू
जिकडे तिकडे सौख्य भरू

१ इसम- अहो, पण हे सगळं करणार कसं? कोणत्या देवाला नवस करून?
सूत्र.- नवस कशाला हवा?
नवस कशाला हवा?
उपाय बुद्धीमध्ये नवा !
२ इसम - कोणता उपाय? खोलात पाय, बुडत बुडत जाय ! कोणता उपाय?
सूत्र.- उपाय विज्ञानाचा करा
एकच मार्ग धरा हा खरा
१- छे, छे, छे ! तुम्ही नास्तिक आहात, पाखंडी आहात, पापी आहात.
२- तुमच्यावर देवाचा कोप होणार. तुम्ही नष्ट होणार. मरणार. तुम्ही खोटे. देव मोठे.
१- आमचाच धर्म खरा. आमचाच देव मोठा.
२- तुमचा नव्हे. आमचाच धर्म खरा. आमचाच देव मोठा. घालील पाठीत सोटा.

१- बघाल. बघाल. आमचाच देव मोठा. करील तुम्हा शिक्षा. मागाल तुम्ही भिक्षा.

२ - आमचाच देव भला. आम्हांला पावला. त्याला भजा. नाहीतर समजा – तुमचा सत्त्यानाश झाला. तुमचा सत्त्यानाश झाला !

१ - आमच्या देवाला नावे ठेवतो ? ये, तुला दाखवतो.

२ - माझ्या देवाला शिव्या देतो? ये, तुझे थोबाड फोडतो.

१ - ये, घे.

२- हे, घे.

१- देवा रे देवा ! मला तार. याला मार.

२- देवा रे देवा, करीन तुझी सेवा. याला नरक दाखवा.

१- थांब. तुझ्यावर बाँब टाकतो.

२- मी टाकतो अ‍ॅटमबाँब.

१- मी टाकतो हायड्रोजनबाँब.

२- मर.

१- तू मर.

२- मेलो. मेलो. माझं डोकं फुटलं.

१- माझं डोकं फुटलं. मेलो. मेलो.

सूत्र.- दमलात आणि पडलात ! कोण तुमचा वाली ? दवाखान्यातच जाण्याची ना आली तुमच्यावर पाळी? बोला आता, कोण पाहिजे, देव किंवा डॉक्टर? एकच निवडा, दुसरा सोडा, देव किंवा डॉक्टर? देव किंवा डॉक्टर?

१- आधी बोलवा डॉक्टर.

२- लवकर आणा डॉक्टर. ना तर शरीर होते लक्तर.

सूत्र.- पडेल तुमच्या उपयोगी का सांगा कुठला फत्तर?

१,२- नाही, नाही, – डॉक्टर !

सूत्र.- सांगा, मंदिरात जाता किंवा शुश्रुषालयी जाता? भ्रमात मरता किंवा सांगा वास्तवात रमता?

१,२- डोकी फुटली, जीव अमुचा जाई.

सूत्र.- कशाला केली ही लढाई? दवाखान्यामध्ये जाण्याची करा घाई. अ‍ॅटमबाँबची युद्धे करता पृथ्वि नष्ट होई. सगळे जग जर मेले तर मग कोण जन्म घेई? वाचवण्याला मानवतेला कोण वरुनि येई ? देव नव्हे तर मानव मनुजा वाचवण्या येई ! विज्ञानाने दुबळा मानव समर्थ हा केला स्वत:स तारुनि पुरता आता तारी जगताला !

* * *

सूत्र.- आजोबा, आजोबा, कुठे चालला ? कुठे चालला?

आ.- लग्न मुलीचे जमवायला, जमवायला.

सूत्र.- लग्न मुलीचं जमलं का? जमलं का? लाडू आम्हा द्याल का? द्याल का?

आ.- लग्न मुलीचं जमत नाही, जमत नाही. पोर वयानं वाढत राही, वाढत राही. घोर पडला, सुटत नाही, सुटत नाही.

सूत्र.- काय झालं सांगा काही सांगा काही

आ.- शनी लागे माझ्या मागे
मंगळ लागे मुलीमागे
लग्न कसे होणार? मुलीचे लग्न कसे होणार? चंद्रबल कसे मिळणार? ताराबल कसे मिळणार?

सूत्र.- आजोबा, फिरतो शनी अपुलिया कक्षेत सूर्यापुढे येऊनी जगती कशास तुमच्या मार्गामधे तो पडे? याने जी सुटली तयावरि वरी भेदूनि त्याचे कडे त्याचे गुप्त रहस्य फोडुनि अता गेलीत त्याच्यापुढे ! आकाशातिल मंगळ ग्रह अता स्वाधीन झाला असे त्याच्यातून धने अमूप लुटण्या माणूस तेथे वसे ! त्याला का म्हणता अमंगल? म्हणा – कुर्यात् सदा मंगलम्।

आ.- दार नाही घराला, घराला
नवरा मिळेना नवरीला, नवरीला

सूत्र.- धरति पुरेना माणसांला, माणसांला !
एक मिळेना तुम्हाला ? तुम्हाला?

आ.- मुलगी शिकली, मोठी झाली
नवरा मिळेना लायकीचा, लायकीचा
दिवा पाहिजे वातीचा, वातीचा
नवरा पाहिजे जातीचा, जातीचा

सूत्र.- नवरा पाहिजे कुठचा? बोला, नवरा पाहिजे कुठचा?
जातीचा की लायकीचा? जातीचा की लायकीचा?

आ.- नवरा पाहिजे दोन्हींचा, दोन्हींचा
जातीचा नी लायकीचा, लायकीचा

सूत्र.– आजोबा, दोन्ही नच मिळणार
आजोबा, दोन्ही नच मिळणार
नवरा जातीचा मिळणार
किंवा लायकीचा मिळणार
बोला, काय तुम्ही करणार?
लग्न करू देणार, मुलीला लग्न करू देणार?
काय मुलीला लग्नावाचुनि कुवारीण ठेवणार?

आ.– देवा, सेवा केली केव्हा विवाहास करणार?
मुलीच्या विवाहास करणार?
काय मुलीचे लग्न बघितल्यावाचुन मी मरणार?
नातू नाही तर स्वर्गी मज पाणी कोण देणार?
देवा, पाणी कोण देणार?
मुलीचे लग्न कधी करणार?

सूत्र.– आजोबा, देव लग्न करणार
तरी मग चिंता का करणार
तुम्ही हो चिंता का करणार ?
देव करी जर मंगळ सगळे प्रश्न कसे पडणार?
तुम्हाला प्रश्न कसे पडणार?

आ.– पूर्वजन्मिचे पाप असे हे देते आम्हा ताप शापच हा पूर्विचा कपाळी भरले पाहिजे माप.

सूत्र.– आनंदाची असे धरा ही दु:खी का होता?
आजोबा, दु:खी का होता?
भलतेसलते विचार करुनी दु:खे का देता?
आजोबा, दु:खे का देता?
स्वयंवर करु द्या. मुलीला स्वयंवर करु द्या !
वधूवरांना आपली आपण जोडी ठरवू द्या !
आशीर्वादच द्या, तुम्ही पण आशीर्वादच द्या !
म्हणजे होई आज सुखाचा आणि सुखी उद्या !!

* * *

सूत्र.– आले, आले नव्या युगाचे नवयुवक आले !
पॅन्ट जीन्सची मनिला पॅरिस
हिप्पी हेअरस्टाइल बालिश
पेन चीनचे बूट रशियन
चष्मा डोळ्यांवरती जर्मन
मनगटावर घड्याळ स्वीडन
मोटर सायकल मेड इन् जपान
गळ्यात ट्रँझिस्टर हाँगकाँगहुन
ओठामध्ये सिगरेट फॉरिन
भारतात जन्मले फक्त भारतात जन्मले
आले आले नव्या युगाचे नवयुवक आले !
भारतीय तरुणा, अहो तुम्हि भारतीय तरुणा
कुठे चालला चंद्रावर की मंगळ सांगा ना !

तरुण – कायमचे जाणार आम्ही कायमचे जाणार
दूरदूर जेथुनी कधी ना पुन: इथे येणार !

सूत्र.– शाब्बास ! शाब्बास !! काय असे करणार? बोला, कुठे असे जाणार?

त. – हे ढेकणाचे वीष खाउनी प्राण अम्ही देणार!

सूत्र.– काय?

त. – हे ढेकणाचे वीष खाउनी प्राण अम्ही देणार !

सूत्र.– टिक्ट्वेन्टी खाउनी ट्वेन्टिफर्स्ट सेंचुरि गाजविणार ट्वेन्टिफर्स्ट सेंचुरि गाजविणार!
कारण झाले काय अम्हाला नाही का कळणार?

त.– नापास झालो कितीकदा, कितीकदा
प्रेमभंगही अनेकदा अनेकदा
बेकारी तर सदान्कदा सदान्कदा
उधार मागुनि झालो आता जीवावरति उदार
वीष खाउनी ठोठावतो अता स्वर्गाचे द्वार !

सू.– काय तुम्ही केले? जीवनी काय तुम्ही केले?
फळ नाही लाभले कसे हो फळ नाही लाभले?

त.– नवस केले देवाला
गेलो सगळ्या पूजेला
नारळ फोडला महापुरुषाला

गाऱ्हाण्याचा गजर केला
उपास केले तापास केले
व्रत केले पारायण केले
शांती केली ग्रहांची
आंगठी घातली खड्यांची
ताइत घातला गळ्यात
मंत्र जपला मनात
देव ठेवला पाण्यात
साकडे घातले सोवळ्यात
शत्रूंवर करणी केली
भूतांवरती मूठ मारली
पाय धरले साधूंचे
तीर्थ घेतले पायांचे
गोमूत्र प्यालो गाईंचे
शेण खाल्ले गाईचे

काय नाहि केले, सांगा, काय नाहि केले
उपाय जितुके आठवले वा कळले ते केले !
पूर्वजन्मिंचे पाप परन्तू हो अडवे आले
वीष खाउनी मरण्याचे हो अता नक्कि केले !

सूत्र.– तरुणा, ये करुणा तुझी रे तरुणा ये करुणा
विज्ञानाच्या युगात जन्मुनि व्यर्थ मुकशि प्राणां
अरेरे, व्यर्थ मुकशि प्राणां

विज्ञान असे वरदान, सौख्याची खाण, देतसे ज्ञान सर्व जगता
बोला काय हवे ते सांगा हो ऽऽऽ जी जी जी
बोला काय हवे ते सांगा आणि खुशाल घेउनि जा गा जी जी जी जी
आली दारी तुमच्या गंगा आळस अवघा हा भंगा
बोला, काय हवे ते सांगा हो ऽऽऽ जी जी जी जी जी

(लोक वेगवेगळ्या मागण्या करतात. सूत्रधार 'घेऊन जा' म्हणतो.)

सुग्रास भोजन हवे !
घेऊन जा !



भरलेले घर हवे !
घेऊन जा !
आरोग्य हवे !
घेऊन जा !
दीर्घायुष्य हवे !
घेऊन जा !
वाहन हवे !
घेऊन जा !
गायन हवे !
घेऊन जा !
नवा खेळ हवा !
घेऊन जा !
प्रवास हवा !
घेऊन जा !
सुंदर साडी हवी !
घेऊन जा !
नवा सूट हवा !
घेऊन जा !
रंगीत फोटो हवा !
घेऊन जा !
सौंदर्य प्रसाधने हवीत !
घेऊन जा !
चंद्र हवा !
घेऊन जा !
मंगळ हवा !
घेऊन जा !

सूत्र. – बोला, विज्ञान महाराज की जय !
लोकहो, ऐका –
विज्ञान महाराज विजयी झाले !
अज्ञानराजाचा पराभव झाला !

आता यावच्चंद्रदिवाकरौ
विज्ञानमहाराजांचेच साम्राज्य
सगळ्या जगतावर,
सगळ्या अंतराळावर,
सगळ्या ब्रह्मांडावर चालणार !
जे विज्ञानमहाराजांशी एकनिष्ठ राहतील
त्यांचे वंश धनधान्याने भरणार !
जे विज्ञान महाराजांशी एकनिष्ठ न राहतील
ते समूळ नष्ट होणार !
बोला –
विज्ञानमहाराज की ऽऽऽ

सर्वजण – जय !!!

● ● ●



# गर्द... गर्द... गर्द...

सूत्र. – (कॉलेजचे कँटीन. मागे कॅलेंडरवर मोठा चालू सन. एका टेबलावर बसून तीन मुले चहा पीत आहेत. दुसऱ्या टेबलावर एकच विद्यार्थी. बेल होते. तो घाइघाईने चहा पितो, जायला निघतो. '––' अशा खुणेने सुरू होणारी वाक्ये हा बोलतो. बाकी संवाद ते तिघे आळीपाळीने बोलतात.)

कुठं निघाला रे?
– बेल ऐकली नाहीत का तुम्ही?
नाही, कान फुटलेत आमचे !
– पण, तासाला चाललोय, दिसत नाही?
नाही. डोळे फुटलेत आमचे !
– तुमच्याजवळ टाइमटेबल नाही का?
आहे की ! (घड्याळ दाखवून) हा टाइम आहे आणि हे टेबल आहे !
– कॉलेजात कशाला आला तुम्ही?
दारू प्यायला.
गर्द खायला.
गुटखा. पानमसाला.
– तुम्ही घ्या. पण मला सोडा.
वेटर, याला 'सोडा.'
वुइथ आइस.
आणि एक पेग.
– ते तुम्हीच प्या. मला जाऊ द्या.
याला एक जाऊबाई द्या.
– तुम्ही तास बुडवता आणि मला बुडवायला लावता?
जाऊ दे रे. जाऊ दे. परीक्षेत त्याला ठेवलाय फर्स्टक्लास.
चूक. डिस्टिंक्शन.

सॉरी. डिस्टिंक्शन. लगेच नोकरी ठेवलीय.
लगेच छोकरी ठेवलीय.
लगेच फ्लॅट.
लगेच कार.
सगळं ठेवलंय. होय ना रे?
– त्यासाठीच तयारी करायला नको?
मिळण्याची गॅरंटी आहे?
– अं... तशी गॅरंटी नाही आहे...
मग घंटी कशाला ऐकतोस?
– तासाला जायला नको?
जाऊन काय? नापासच ना? पास झाला तरी बेकारच ना? आधी अभ्यासानं मरायचं मग उपासानं मरायचं. जा बाळा, जा. वर्गात जा. लेक्चरला जा. लायब्ररीला जा.

बाळ लेक्चरला जातो हो
जाऊ द्या
बाळ लायब्ररीला जातो हो
जाऊ द्या
बाळ परीक्षेला जातो हो
जाऊ द्या
बाळ पास होतो – पहिला नंबर मिळवतो –
आणि, उपाशीपोटी राहतो
राहू द्या
बायकोवाचून झुरतो हो
झुरू द्या
घरावाचून भटकतो हो
भटकू द्या

– अरे, पण मग करायचं तरी काय?
तुला नोकरी पाहिजे?
पाहिजे !
तुला छोकरी पाहिजे?
पाहिजे !



तुला फ्लॅट पाहिजे ?
पाहिजे !
एका क्षणात–सुखाची बरसात. हे बघ. एकच झुरका.
– मला नको झुरका.
तो मारतोय मुरका.
– मला नको रे. खरंच नको.
तू चहा पितोस ना?
– पितो ना.
तू जेवण, करतोस ना?
– करतो ना.
तू पाणी पितोस ना?
– पितो ना.
त्यावाचून तुझं चालतं का? तसंच हे !
अरे, चहाचं युग गेलं.
बिडीचं युग गेलं.
सिग्रेटचं युग गेलं.
आता गर्दचं युग आलं !
तू बैलगाडी घेणार का रे? की स्कूटर? बैलगाडीतून येणार का कॉलेजात? अरे कॉलेजला पाहिजे स्कूटर. एक किक मारली की झूम. तसंच एक झुरका मारला की धूम.
– नको. नको. खरंच नको.
अरे हे युग रॉकेटचं. एकदम आकाशात. चहाची तलफ बैलगाडीच्या युगातली. गर्दची तलफ रॉकेटच्या युगातली.
– नको. नको. नको.
विमानात कधी बसलाहेस? सवय नको? विमानाची सवय नाही तर रॉकेटात कसा बसणार?
– नको. नको. नको.
नको. नको. नको.
त्याला नको.
फुको फुको फुको
आम्ही फुको

फुका रे फुका
घ्या रे झोका
फुका रे फुका
चिंता फेका

– अरे, पण तुम्हांला हे हे हे परवडतं कसं?

Where there is a will there is a way.
इच्छा आहे तेथे मार्ग आहे.
साखरेचे खाणार त्याला देव देणार.
अरे, तूने पीही नही. एकदा ओढच आणि मग बघच.
कशा कल्पनाच कल्पना सुचतात. आधी कल्पनांचा पाऊस.
मग पैशाचा पाऊस !

– पैशाचा पाऊस ?

पैशाचा पाऊस ! महापूर ! ओला दुष्काळ ! आमच्यातल्या कुणाचाही खिसा झाड. झाडाला पैसे लागतात ! तुला नकोत?

– नकोस कसे? हे सगळं कशासाठी?

कशासाठी ? पैशासाठी !
बेहोषीच्या चैनीसाठी !
राजासारखं जगण्यासाठी !
लक्षाधिशाच्या ऐटीसाठी !
एक झुरका एक भुरका
जिकडे तिकडे पैकाच पैका
हर वस्तूला पैकाच पैका
आमची गंमत ऐकाच ऐका
टेबलाला पैका
खुर्चीला पैका
कपड्याला पैका
पेनला पैका
घड्याळाला पैका
पुस्तकाला पैका



वहीला पैका
पैका फेका पैका फेका
ज्याला त्याला पैकाच पैका
आमची गंमत ऐकाच ऐका
पैक्याला मिळतात दोनदोन बायका

तुला मिळालीय का रे कुणी पोरगी?

– अहो, हे काय भलतंच? पोटगीशिवाय पोरगी कसली?

तुझ्या जन्माची वाट लागली.
अरे घे. एकच झुरका एकच भुरका. पोरगी बसते मारीत हाका. अरे, नाहीतरी तू पोरीच्या तोंडावरची पावडरच हुंगणार ना? मग ही हुंग ! ही आहे स्वर्गातल्या अप्सरेच्या तोंडावरची पावडर. अरे, स्वर्गातले देवसुद्धा सोमरस पितात. हिमालयातले देव धुनी लावून चिलीम ओढतात.

बं बं बं बं बं बं भोले
शंकर डोले
डं डं डं डं डमरू बोले
शंकर डोले
हर खातो जहर करतो देवांवरती कहर
गळा झाला काळा भस्म भरतो भाळा
बाकी देव क्षुद्र लाडू मोदक खातात
शंकर देव महादेव गर्द पचवितात.

अरे, गर्द घे ! देव तारी त्याला कोण मारी?

– नको. नको. मी जातो. द्या माझी वह्या पुस्तकं. तुझ्या वह्या पुस्तकांची किंमत काय?

– दोन शे रुपये.

हे घे अडीचशे

– पण मला हव्यात त्या. विकायच्या नाहीत.

मग किंमत कशाला सांगितलीस?

– ती ह्यांची किंमत आहे.

तुझी किंमत काय रे?

तुझी किंमत काय बोल तुझी किंमत काय?
बेकाराला किंमत नाही बुडत्या खोलात पाय !
अरे, बैस. बैस. बैस जरा ऐसपैस. ऐटीत ऐस.
मनकी खुशी, दिन का राजा.
गर्द की खुशी, जिंदगी का राजा !
मर्द खातो गर्द आणि षंढ होतो सर्द
केतकीच्या बनात निघतो नाग पिवळा जर्द.
नाग लागतो डोलायला डोलायला
नागीण लागते नाचायला नाचायला
नाग नागीण कोणाची कोणाची
शंकरजींच्या गळ्याची गळ्याची
शंकरजींच्या गळ्यात काय गळ्यात काय
गर्द... गर्द... गर्द
गर्द... गर्द... गर्द
शंकरजी भणंग भिकारी
विष्णू त्याला नमन करी !
गर्द ओढा छान !
लाभते पैशाची खाण !
अरे, तुझीमाझी हवा एक
हवेमध्ये धुराची रेख
श्वास झाला धुराचा
धूर आहे गर्दाचा
आपण सारे गर्दमय गर्दमय
गवसली जगण्याची लय जगण्याची लय
बोला, गर्दानंद महाराज की जय !
मद्यानंद महाराज की जय !
गुटखा पान मसालानंद महाराज की जय !
गर्दचा ढग जेव्हा येतो
पाऊस पैशाचा पडतो



ज्याला त्याला पैसाच पैसा
जिकडे तिकडे पैसाच पैसा
टेबलाला पैसा खुर्चीला पैसा
घड्याळाला पैसा पुस्तकाला पैसा
पेनला पैसा वहीला पैसा
लॉटरी कधी फुटत नाही
गर्दला पैसा फुटल्यावाचून राहत नाही
पैसा पैसा हवा किती
गर्द गर्द करा गर्दी
प्रत्येक वस्तूचे रूपांतर गर्द पैशात करतो
त्यामुळे गर्द ओढणाराला कधी तोटा नसतो

पहिला विद्यार्थी– माझी, आई मोठी प्रेमळ
पैसा देते बक्कळ
म्हणते, ‘ बाळ वाळला. किती अभ्यास. किती कष्ट. खाऊ खा. घे हे पैसे. दिवसभर कॉलेजात जातोस. उपाशी पोटी राहू नकोस.’ मी म्हणतो, ‘अभ्यास वाढला. पुस्तके हवीत आणायला. वह्या पाहिजेत आणखी मला.’ आई म्हणते, ‘होय रे बाळा. घे हे पैसे’ मी म्हणतो, ‘आई, मी खेळ खेळतो. अभ्यासात माझा पहिला नंबर. प्रत्येक खेळात पहिला नंबर. पण खेळाचा ड्रेस हवा. प्रत्येक खेळाचा ड्रेस निराळा. प्रत्येक खेळाचा बूट निराळा.’ आई म्हणते, ‘घे रे बाळा.’ आई तशी शहाणी आहे. म्हणते, ‘ड्रेस कुठे? बुट कुठे?’ मी म्हणतो ‘कॉलेजमध्ये ! रोजरोज कोण नेणार आणणार?’ मी म्हणतो, ‘माझा सगळ्यांत पहिला नंबर. गाण्यात पहिला. भाषणात पहिला. लिखाणात पहिला. खेळण्यात पहिला. गावोगावी मला स्पर्धांसाठी लागते जायला.’ आई म्हणते, ‘पैसे घेतल्यावाचून भरपूर जाऊ नको दूरदूर.’ असा पैसा येतच राहतो! गर्द गर्द होतच राहतो !

दुसरा विद्यार्थी– अरे, आईला काय कुणीही फसवेल ! मी बापाला फसवतो. मी सांगतो, ‘बाबा, घड्याळ गेले!’ बाबा बोलतात, ‘घड्याळ काय

फुकट आले? कसे गेले?' 'बाबा, बाबा, काय करणार? जिकडे तिकडे चोरबाजार. रस्त्यात चोर. गाडीत चोर. कॉलेजात चोर. हॉटेलात चोर. अल्लीबाबा चाळीस चोर. आज बाबा, सगळेच चोर ! घड्याळ चोरतात. पेन चोरतात. चष्मा चोरतात. पुस्तके चोरतात. वह्या चोरतात. सगळं चोरतात.' मग बाबा रागावतात. पण पुन: पैसे देतात. मी सांगतो, 'बाबा, जिकडेतिकडे भ्रष्टाचार. कष्टाला नाही आधार. प्रोफेसर पैसे मागतात. पैसे खाऊन पास करतात. जितके जास्त पैसे देणार तितका नंबर वर येणार !' मग बाबा रडतात, 'काय करणार? काय करणार? कुठे कुठे पुरे पडणार?' पण वरती नंबर आलाच पाहिजे. नाव राखलेच पाहिजेस माझे. घे हे पैसे. पण जपून वापर कसे !' असा पैसा येतच राहतो ! गर्द गर्द होतच राहतो !

तिसरा विद्यार्थी– हुं: ! बापाला काय, कुणीही फसवेल. शेवटी बाप तो बापच. पोर म्हणजे त्याचेच पाप. फेडलेच पाहिजे. अरे, माझा काका वकील. भल्याभल्यांना ठकवील. गुन्हेगाराला हमखास सोडवील. खऱ्याचे खोटे करील. खोट्याचे खरे करील. मीपण पुतण्या त्याचाच ना? फर्स्टक्लासची डिग्रीच तयार केली. हुबेहूब रंगवली. काकाचा चष्मा लपवून ठेवला. फर्स्ट क्लास कागद हातात दिला. काका माझा खूष झाला. म्हणाला, 'घे हे हजार वरखर्चाला.' मी म्हटले, 'कशाला?' पण पैसा खिशात कोंबला. मग म्हणालो, 'काका, दिल्लीला इंटरव्ह्यू आहे.' काका म्हणाला, 'शाब्बास ! शाब्बास ! घे हे पाच हजार' मी म्हणालो, 'काका, कलकत्त्याला इंटरव्ह्यू आहे. दिल्लीचा इंटरव्ह्यू छानच झाला. पण जिकडे तिकडे वशिला? काका म्हणाला, 'अरे, तूपण लाव वशिला. घे हे पाच हजार त्याला?' मी म्हणालो, 'कलकत्त्याचा चान्स गेला. बंगाल्याला बंगाली मिळाला. आता मद्रासला इंटरव्ह्यू आहे. माझे क्वालिफिकेशन हाय ! बोलावणे आल्याशिवाय राहते काय? पण नेमणूक मात्र देत नाहीत. सगळीकडे खोटी रीत.' काका म्हणतो, 'रडू नकोस. रडू नकोस. गेल्याशिवाय राहू नकोस. घे हे आणखी पाच हजार.' मी म्हणतो, 'काका, नोकरी लागल्यावर पै पै परत करणार !' माझी दिल्ली, माझे कलकत्ता, माझे मद्रास सारे सारे येथेच खास ! नोकरी काही लागली नाही. रागारागात काकासमोर गेलो. डिग्रीचा कागद फाडूनच टाकलो ! काका म्हणतो, 'धंदा कर. घे हे पैसे आणखी धर.' मी म्हणतो, 'गुंतवणूक चालू आहे. फायदा होताच देणार आहे!' आमची गुंतवणूक चालूच आहे !
असा पैसा येतच राहतो. गर्द गर्द होतच राहतो !

– अरे पण असे कायम चालेल कसे?
कशाला उगीच काळजी करणार?
आज आपण मजा मारणार !
उद्याचा सूर्य उद्या उगवणार !
सात पावले चालले की सात जन्मांचे नाते झाले.

आमच्या धुरात तुझे नाक. आता थोडासाच खाली वाक. या धुरानेच तू कॉलेज विसरलास. क्लास विसरलास. अभ्यास विसरलास. कटकट विसरलास सारेसारे विसरलास. सगळ्या काळज्या एकदम खल्लास. असा हा धूर फर्स्टक्लास. गर्दचा धूर वरती वरती. आपण सारे धूर साथी !

– नको. नको. नको. गर्द म्हणजे मरण. एकदोन वर्षात खलास.
अरे अपघात होत नाहीत का? अपघातात किती मरतात? रस्त्यांवर... रेल्वेवर.... रोजच्या रोज माणसं मरतात. पण कोणी रस्त्यांवर आल्यावाचून राहतात? तसंच गर्दचं. गर्दीनं मरण्यापेक्षा गर्दनं मरणं बरं. अरे पण लक्षात ठेव. बिडी म्हणजे बैलगाडी. सिग्रेट म्हणजे मोटरकार. गर्द म्हणजे रॉकेटविमान ! विमानांनेच अपघात थोडेच होतात. मोटरखालीच जास्त मरतात. नीट काळजी घेतली की रस्त्यावरच काय, रेल्वेलाइनवरसुद्धा सुरक्षित राहता येतं. तसंच गर्द. अरे गर्द भाई, आम्ही आहोतच की नाही?
(सगळे गातात)

बोल बोल बोल गर्द गर्द बोल है
डोल डोल डोल गर्द गर्द डोल है
खोल खोल खोल गर्द गर्द खोल है
तोल तोल तोल गर्द गर्द तोल है

टोल टोल टोल	गर्द गर्द टोल है
मोल मोल मोल	गर्द गर्द मोल है
गोल गोल गोल	गर्द गर्द गोल है
गर्द हा हिंदोल	बाकी सारं फोल है
ढोल ढोल ढोल	गर्द गर्द ढोल है
गर्द मोठा घोळ	बाकी बङ्ख्याबोळ है

(काळोख. प्रकाश येतो तेव्हा भिंतीवर कॅलेंडर – दोन वर्षांनंतरचा सन.)

(दोघेच येतात. त्यांचीही शेवटचीच अवस्था. एकाच पुडीसाठी दोघांचे भांडण.)

दानेदानेपे लिखा है खानेवाले का नाम. या पुडीवर माझं नाव आहे. मी सगळ्यांची वाट लावली. तुझीपण लावणार आणि मगच मरणार. मर. मर. (ठोसा मारतो.)

– गर्दचा विळखा पडला. जन्म चिंधीचोळ झाला. गर्दचा एक झुरका घेतला. सारा जन्म कचरा झाला. वयात येण्यापूर्वीच सारा कारभार आटोपला !

(दोघेही पडतात.)

● ● ●



# नवरा नको ग बाई

('–' खुणेने सुरू होणारे संवाद एक विशिष्ट तरुणी बोलते. बाकी तिच्या मैत्रिणी.)

ए चल ग, फिरायला जाऊ.

अग नाटक चांगलं लागलंय. नाटकाला जाऊ या. नको. नको. त्याहून चांगला सिनेमा लागलाय. सिनेमालाच जाऊ या. काय ग, तू बोलत नाहीस? बोल काहीतरी. तू म्हणशील तिकडेच जाऊ या.

– अग आपण मुली. आपला कोण वाली? एकदा नवऱ्याच्या घरी गेली की गंगेत घोडी न्हाली !
बायको म्हणजे नवऱ्याची छाया.
बायको म्हणजे नवऱ्याची माया.
नवऱ्याशिवाय बायको वाया.

– म्हणून म्हणते,
चल ग सखे सासुराला सासुराला सासुराला ग
नवरोबाला पुजायाला पुजायाला पुजायाला ग
पुजायाला नवरोबाला नवरोबाला नवरोबाला ग
नवरोबाची सेवा करायला सेवा करायला सेवा करायाला ग
नवरोबाच्या चरणाचे तीर्थ प्यायला तीर्थ प्यायाला ग
नवरा जेवता वारा घालायला वारा घालायला वारा घालायाला ग
नवरोबाच्या उष्ट्या ताटात उष्ट्या ताटात जेवायाला ग
नवरोबाचे पाय चेपायला पाय चेपायला पाय चेपायाला ग
नवरोबाची पोरं वाढवायला पोरं वाढवायला पोरं वाढवायाला ग
झालं ना नवरोबाला पुजणं? चला आता फिरायला.

– अग, एवढ्यानं का नवरोबा प्रसन्न होणार?
ऐलमा पैलमा नवरोबा देवा
माझा संसार मांडून दे करीन तुझी सेवा
माझं गाव टाकुन देऊन येइन तुझ्या गावा
आईबाप टाकुन देऊन येइन तुझ्या गावा

घरदार टाकुन देऊन येइन तुझ्या गावा
माझं नाव टाकुन देऊन घेइन तुझ्या नावा
सारंसारं टाकुन देऊन करीन तुझा धावा
नवरोबा नवरोबा रुसतो
नवरोबा अडून बसतो
नवरोबा घुश्श्यात असतो
नवरोबा खुशीत नसतो
नवरोबा नवरोबा राग नको बाबा
मागाल ते आणुन देइन वाढविन तुमची शोभा
आला ग नवरोबा आला
कुंकवाला आधार झाला
संसारात भोज्या बसला
नैवेद्य दाखवू त्याला
संसार त्याचीच माया
त्याच्याकरता झिजवू काया
सोनं द्या चांदी द्या
गाडी द्या माडी द्या
आगळं द्या सगळं द्या
शेवटी एकदा जीव द्या
आता तरी झालं ना? मग चला फिरायला.
– अग, नवरोबा म्हणजे काय असातसा देव आहे?
झिम पोरी झिम
झिम्मा खेळू या ग झिम्मा खेळू या
निम्माशिम्मा जीव आमचा पूर्ण देऊ या
सारं काही टाकुन देऊन नवरा करू या
नवऱ्याच्या हाताला हात लावू या
सारे त्याचे तोच करणार मम म्हणू या
त्याच्या संसाराचे गाणे गाऊ या
झिम पोरी झिम



कपाळाचं भिंग
भिंग गेलं फुटून
नवरा आला धावून
नवरोबा बायकोला गुलाम करतो
संसाराचा राजा झिम्मा खेळतो
नवरोबा बायकोवर जुलूम करतो
संसाराचा राजा राज्य करतो
बायकोला पायाची दासी बनवितो
नवरेशाहीची ऐट मिरवितो
झिम पोरी झिम
तुझा जीव किम
त्याच्या पायी वहा
त्याच्या दारी रहा
झिम पोरी झिम
नवऱ्याला नाही ढिम
नवऱ्याचं घर भर
कष्टाखाली मर
पहिली बायको पटकन मेली
दुसरी बायको चटकन केली
एकामागून एक नवरा लग्नं करतो
जितकी लग्नं तितक्या बायकांवर उपकार करतो
झिम पोरी झिम
पुष्कळ झालं नवरोबाचं भजन-पूजन-कीर्तन !
– अग हळू बोल हळू. आरती राहिलीच की ! आरती नाही केली तर नवरोबा टाकून देईल, जीव घेईल, काय वाट्टेल ते करील.
जयदेव जयदेव जयजय नवरोबा
तुमचेनी प्रसादे करु संसारा या जयदेव जयदेव
नवरोबाची कीर्ती पोथ्या सांगती
नवरोबा हा देव सगळ्या देवांवरती

नवरोबाचे म्हणुनी पाय धरू या जयदेव जयदेव
नवरोबाला अकलेची आवश्यकता नाही
नवरोबाला वळण लावायचे नाही
नवरोबा म्हणतील त्या कार्या करू या जयदेव
बायकोला टाकायचा हक्क तुम्हां आहे
बायकोला मारायचा अधिकारहि आहे
दुसरी बायको करायला मोकळिक देऊया जयदेव
घालीन लोटांगण वंदीन चरण
जरी रूपहीन ध्यान तुमचे
पैशांनि ओवाळिन देणग्यांनि पूजिन
वस्त्रांनी भरीन घर तुमचे
चोविस तास सेवा करीन
मुकाट्याने लाथा खाईन
गप्प बसून ऐकेन तोंड तुमचे
नवरोबा आयतोबा महाआळशी ठोंबा
संसाराचा खांबा नशीब आमचे
ॐ यज्ञ करूनी जाळून घेउनी
नवरोबाचे स्तोत्र गायचे
नवरोबा महाराज की जय !
नवरदेव करा आराम
आमचे काम तुमचे नाम
नवरा हरी सारे हरी
पैसा हरी वस्तू हरी जीव हरी
सा रे सारे हरी

हरी हरी हरी हरी हरी हरी हरी ऽऽऽ हो ! आरती झाली ना? मग प्रसाद वाटा आणि चला.

– अग नवरोबाची कहाणी ऐकलीस का? नाही ना? मग? ऐक कहाणी नाहीतर होशील पापिणी –



ऐका ऐका नवरदेवा तुमची कहाणी. आटपाट नगर होतं. चौसोपी वाडा होता. झाडामाडांचा बाग होता. घोड्यागाड्यांचा थाट होता. अलंकारांचा घाट होता. पिढ्यान्‌पिढ्यांचा पैसा होता. अकलेचा पत्ता नव्हता. दयेला थारा नव्हता. मायेचा वारा नव्हता. अशा घरात एक नवरोबा होता. खाऊनखाऊन फुगला होता. बायको हवी तोलामोलाची. म्हणजे त्याच्या वजनाइतके सोनेरुपे देणारी. अशा गावी. गरीब माणूस. चंद्रमौळी झोपडी. दारात गायकालवडी. घरात बायकामुलींच्या झुंडी. मुलीला शिक्षण नको. मुलीला भक्षण नको.  मुलीला फक्त एक पाहिजे – नवरा पाहिजे. त्या गरीब माणसाने कपाटे धुंडाळली. सारी चीजवस्तू विकली. गाईंची, कालवडींची विक्री केली. तिथी कोणतीही असो एकादशीच केली. मोठी माया जमा केली. नवरोबाचा उंबरा झिजवला. हवा तेवढा हुंडा दिला. लग्नाचा बार उडवला. बायकोला नवरा मिळाला. बायको पाणी भरी. घर झाडी. सडासंमार्जन करी. जेवण वाढी. उष्टी काढी. रात्री गाद्या घाली. नवरोबाचे पाय चुरी. दमूनभागून झोपी जाई. चंद्राला ग्रहण लागले. नवरोबाला व्यसन लागले. वेळ रिकामा. आत्मा रिकामा. दारूवाचून चैन पडेना. पैसा काही पुरा पडेना. बायकोला मारू लागला. ‘बापाकडून पैसा आण’, सांगू लागला. होते नव्हते ते बापाजीने दिले. शेवटी जीवपण दिला. माहेर संपले. पैसा संपला. बायको चूल सांभाळीत होती. एके दिवशी चुलीनेच तिला सांभाळले. नवरोबाने अनेक लग्ने केली. दरवेळी हुंड्यांची रक्कम वाढवून घेतली. वसूल केली. अशी ही साठा उत्तरांची कहाणी एका हुंड्याच्या उत्तराने सुफळ संपूर्ण झाली !
आता बाई काही राह्यलं नाही ना?

– अशी कशी ग तू नास्तिक? तुला नवरोबा नको?
दादला नको ग बाई हिला दादला नको ग बाई
नवरा नको ग बाई हिला नवरा नको ग बाई
थोराघरची लेक, हिची वागणूक नेक, करते शब्दांची फेक
हिला यजमान नको ग बाई हिला यजमान नको ग बाई
ही झाली हुषार, करी सर्वां गप्पगार, हर कामी पुढार
हिला मालक नको ग बाई हिला मालक नको ग बाई

ही मिळवी पैसा, जाई देशादेशा, बोले अनेक भाषा
हिला धनी नको ग बाई हिला धनी  नको ग बाई
ही हाकते गाडी, नव्या वाटा काढी, सारे शत्रू पाडी
हिला वेसण नको ग बाई हिला वेसण नको ग बाई
हिचा मैत्रिणींचा मेळ, ही खेळते सगळे खेळ, रिकामा नाही वेळ
हिला बंधन नको ग बाई हिला बंधन नको ग बाई
चूल आणि मूल, आता झाले फजूल, ही कलेत गुल
हिला संसार नको ग बाई हिला संसार नको ग बाई
केली पुरुषांवरती मात, जिंकली सगळ्या क्षेत्रांत,
राज्य चालवी जोषात
हिला घुंघट नको ग बाई हिला घुंघट नको ग बाई
हवे तरी काय हिला?        थोडक्या मध्ये बोला
हिला नवरा नको,        सोबती हवा
हिला नवरा नको,        मित्र हवा
हिला नवरा नको,        बरोबरीचा हवा
हिला नवरा नको,        खेळगडी हवा
हिला नवरा नको,        जोडीदार हवा
हिला नवरा नको,        साथीदार हवा
हिला नवरा नको,        भागीदार हवा
हिला नवरा नको,        सहचारी हवा
आणि त्याच्या बरोबर        छोटासा
आटोपशीर संसार हवा !



## मुरलीधर जावडेकर साहित्यकला प्रतिष्ठान

| | |
|---|---|
| अ | **काव्य** |
| १ | नव्या युगाच्या कविता |
| २ | 'नवरा नको ग बाई' आणि इतर पथनाट्ये |
| ष्ट | **कथा** |
| ३ | 'नको हे पुरुषी मन' आणि इतर लघुकथा |
| ४ | शुभ मंगल ! विज्ञान !! (विज्ञान कथा) |
| ५ | 'अवतार' आणि इतर कथा |
| पै | **नाटक** |
| ६ | मस्तानीचा बाजीराव |
| ७ | सत्तेचा विजय असो ! |
| ८ | प्रीती मिळेल का हो ? |
| ९ | गजराज आणि वनराज |
| १० | आग लागो या सगळ्याला |
| ११ | चल ये, चल ये,  चल ये, बयेऽ |
| १२ | 'निम्मी माझी, निम्मी तुझी' आणि इतर एकांकिका |
| लू | **पटकथा** |
| १३ | स्वातंत्र्यवीर |
| सा | **कादंबरी** |
| १४ | त्सुनामीची सुवर्णसंधी |
| १५ | किलर इन्स्टिंक्ट |
| १६ | अंतिम सत्य |
| हि | **विज्ञान** |
| १७ | विज्ञानाचा कल्पतरु |
| त्यि | **समीक्षा** |
| १८ | साहित्यातील प्रीती आणि भक्ती |
| १९ | महाराष्ट्रातील वैज्ञानिक क्रांती |
| २० | केशवसुत: वैदिक संस्कृतीचा आधुनिक उद्गाता |
| २१ | केशवसुत गातचि बसले ! |
| २२ | वैज्ञानिक समीक्षा |
| क | **संकीर्ण** |
| २३ | हिंदू समाजाचा छेदाभ्यास |
| २४ | इंग्रजीत नापास ? अशक्य !!! |
| २५ | To Be, or Not To be |

## प्रतिभेचा स्तिमित करणारा साक्षात्कार

### मुरलीधर जावडेकर यांची कला

| | | |
|---|---|---|
| कथाकथन | :- | १५ ऑगस्ट १९९९ रोजी स्वातंत्र्यदिनानिमित्त अमेरिकेत कथासंग्रहप्रकाशन आणि कथाकथन केले. महाराष्ट्रात अनेक प्रयोग केले. श्रोते चकित, आनंदित, प्रभावित होतात. कितीही वर्षे जावोत पुन: भेटले की कथांची आठवण काढतात. आजचे आघाडीचे कथाकार. |
| नाट्यवाचन | :- | 'मस्तानीचा बाजीराव' या स्वत:च्या नाटकाचे वाचन थोरल्या बाजीरावांच्या तीनशेव्या जन्मदिनी पुण्यात केले. त्यानंतर दूरदर्शन (सह्याद्री) ने मुलाखत घेतली आणि नाट्यवाचनाचे वर्णन 'मंत्रमुग्ध करणारे' असे करून ती प्रसृत केली. डॉ. वि. भा. देशपांडे आदींना आवडलेली संहिता आणि नाट्यवाचन. |
| काव्यप्रस्तुती | :- | साहित्यसंमेलनाध्यक्ष कविवर्य श्री. नारायण सुर्वे, गंगाधर महांबरे, संगीता जोशी इत्यादींना आवडलेल्या कविता. 'काव्यसंग्रहप्रकाशन आणि काव्याचे नाट्यपूर्ण बहारदार सादरीकरण' केले. |
| एकपात्री नाट्यप्रयोग | :- | 'स्वातंत्र्यवीर' (वि. दा. सावरकर) हा (सावरकरांच्या ६ ध्वनिमुद्रित पदांसह) प्रयोग अत्यंत प्रभावी होतो. स्वर्गीय सुधीर फडके, शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, स्वा. सावरकर संमेलनाध्यक्ष वा. ना. उत्पात आदींनी दाद दिली. प्रेक्षकांना सावरकर भेटल्याचा परमानंद होतो. पुण्याच्या 'सांस्कृतिक वार्तापत्र' संस्थेने याबद्दल सत्कार केला. |
| व्याख्यान, मुलाखत इत्यादी | :- | धर्म, विज्ञान, संस्कृती, वाङ्मय इत्यादी विषयांवर महाराष्ट्रातच नव्हे तर अन्य प्रांतांतही अनेक व्याख्याने झाली. दूरदर्शन आणि आकाशवाणी यांनी अनेक मुलाखती घेऊन पुन: पुन: प्रसारित केल्या. |

**डॉ. मुरलीधर जावडेकर**

**जन्म** : २० मे १९३६. **शिक्षण** : एम्.ए.(पुणे), पीएच्.डी. (मुंबई).

**व्यवसाय** : मराठी, इंग्रजीचे प्राध्यापक, प्राचार्य.

म्हाडा उच्च उत्पन्न गट वसाहत, इमारत क्र.१,गाळा क्र.९,

संत तुकाराम नगर, पिंपरी, पुणे - ४११ ०१८ (महाराष्ट्र राज्य-भारत)

दूरध्वनी : 020-27421683, मोबाईल : 9890169156